**थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरित करणेबाबत. (लेखाशीर्ष २२०५ ३६२६)- १६, प्रकाशने.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः संकीर्ण-२०२२/प्र.क्र.२६/आस्था-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२

**वाचा:-** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०२२/प्रक.२६/आस्था-२, दिनांक २४.०३.२०२२
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीजीटी-२०२१/ प्र.क.९६/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ३०.०३.२०२२

**ज्ञापन:-**

शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना त्यांचे पत्र क्र.उशिसं/२०२०/ डॉ.बाआंचसाप्रस/छपाई देयक/प्रशा-३/१६६५, दिनांक २२.०२.२०२२ला अनुसरुन असे कळविण्याचे मला आदेश आहेत की, डॉ. बाबासाहेब आंबेडकर व महात्मा जोतिराव फुले यांचे साहित्य प्रकाशित करण्यात आलेल्या साहित्याची छपाई व बांधणीच्या कामांसाठी ₹१,५५,००,०६०/- (रुपये एक कोटी पंच्चावण्ण लक्ष साठ फक्त) इतक्या रक्कमेची मागणी केलेली आहे. सदर कामांना शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०२२/प्रक.२६/आस्था-२, दिनांक २४.०३.२०२२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अनुसूचित जाती घटकांकरिता थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्यांचे प्रकाशनाच्या योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र. एन- ३ (कार्यक्रम) लेखाशीर्ष २२०५ ३६२६- खाली ₹११२.४० लाख मूळ तरतूद असून सुधारित तरतूद ₹८४.३०लाख एवढी आहे. सदर ₹८४.३०लाख इतका निधी उपरोक्त शासन निर्णय, दिनांक ३०.०३.२०२२ नुसार वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त खर्चाची देयके अदा करण्यासाठी ₹८४,३०,०००/- (रुपये चौऱ्यांऐशी लक्ष तीस हजार फक्त) इतका निधी याद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर खर्च, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष सहाय्य योजना (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०१) थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन (कार्यक्रम) लेखाशीर्ष-(२२०५ ३६२६), १६-प्रकाशने” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२च्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त खर्च शासनाच्या प्रचलित कार्यपध्दतीनुसार तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ३०.०३.२०२२च्या शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तीनुसार करण्यात यावा.

४. सदर ज्ञापन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/ प्र.क्र.९६/अर्थसंकल्प(विघयो), दिनांक ३०.०३.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०३३११५३८४०६४०८ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2022.03.31 15:39:35 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत, माहितीकरीता:-**

१) मा.मंत्री ( उ. व तं. शि. ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री ( उ. व तं. शि. ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (उ. व तं. शि. विभाग), मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (कार्यासन विघयो), मंत्रालय, मुंबई.
५) वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-८), मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-।, मुंबई.
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) सह संचालक (उच्च शिक्षण), मुंबई विभाग.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२) सदस्य-सचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समिती, मुंबई.
१३) सदस्य-सचिव, महात्मा जोतिराव फुले चरित्र साधने प्रकाशन समिती, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प (विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) कक्ष अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६) निवड नस्ती (आस्था-२).